**वन विभागाचे प्रसिध्दी व माहिती शाखा प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय, पुणे यांच्या अधिपत्याखाली आणण्याबाबत.**

**महाराष्ट्रशासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१५/प.क्र.५७/फ-११**
मादाम कामा मार्ग, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १६ जुलै,२०१५

वाचा:-

१) **शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण :- २०१४/प्र.क्र.१८८/फ-५, दिनांक:- ४/१२/२०१४**
२) **प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष- २६/प्रमाअ/लले/प्र.क्र. ५३/२५३/१५-१६, दिनांक १८/०६/२०१५ पत्र.**

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभागाच्या दि. ४.१२.२०१४ रोजीच्या शासन निर्णयानुसार ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या नियंत्रणाखाली असलेले सामाजिक वनीकरण संचालनालय हे महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात आले आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे संदर्भ क्रमांक- २येथे नमूद दि.१८.६.२०१५ रोजीच्या पत्रान्वये सामाजिक वनीकरण संचालनालय, वन विभागातंर्गतप्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय, पुणे यांच्या अधिपत्याखाली आणण्याबाबत शिफारस केली आहे. त्याअनुषंगाने प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

वन विभागाचे प्रसिध्दी व माहिती शाखा, वन, वन्यजीव, सामाजिक वनीकरण व वन आणि सामाजिक वनीकरणाशी संबंधित इतर सर्व बाबींकरिता प्रसिध्दी व विस्तार या कामासाठी सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या नियंत्रणाखाली आणण्याच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे.

त्याअनुषंगाने विभागीय वन अधिकारी ( प्रसिध्दी व माहिती -वने) पुणे, यांचे कार्यालय प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय, पुणे यांच्या कार्यालयाशी संलग्न करण्यात येत आहे.

प्रसिध्दी व माहिती अधिकारी (वने), नागपूर यांच्याकडे सध्या उपलब्ध कर्मचाऱ्यांपैकी एक चमू त्यांच्या अंतर्गत ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. ते प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपूर यांच्या कार्यालयातील एक कक्ष म्हणुन काम करतील. तसेच हे कार्यालय शासनाशी व प्रधान मुख्य वनसंरक्षक, व महासंचालक, सामाजिक वनीकरण,पुणे यांच्या कार्यालयाशी समन्वय करतील. याशिवाय ते अ.प्र.मु.व., (धोरण व तंत्रज्ञान आणि प्रसिध्दी ) यांच्या मार्गदर्शनाखाली वनविभागाचे संकेत स्थळ अद्यावत करणे. प्रधान मुख्य वन संरक्षक (वनबल प्रमुख)व इतर कार्यालयामध्ये समन्वयाची कामे करतील.

प्रसिध्दी व माहिती अधिकारी (वने),नागपूर यांच्या कार्यालयातील उरलेले तांत्रिक कर्मचारी वर्ग जसे कलाकार, प्रक्षेपी यंत्रचालक आणि काही कार्यालयीन कर्मचारी, वाहन चालक इ. सहाय्यक प्रसिध्दी व माहिती अधिकारी(वने), नागपूर यांचे अधिनस्त ठेवण्यात येतील. सदर कर्मचारी प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य,पुणे या संचालनालयातंर्गत एक कार्यालय म्हणून प्रसिध्दीचे कामे करतील.

क्षेत्रीय स्तरावर उपमहासंचालक सामाजिक वनीकरण हे त्यांचे कार्यक्षेत्रातील प्रसिध्दी व विस्ताराबाबत समन्वय साधतील. स्थानिक स्तरावर उपमहासंचालक यांचे कार्यक्षेत्रात सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), वनसंरक्षक (वन्यजीव) यांची एक समिती गठीत करण्यात येईल. उपमहासंचालक यांचे कार्यक्षेत्रात सर्वात वरिष्ठ अधिकारी अध्यक्ष म्हणून समन्वयाचे काम करतील. उपमहासंचालक यांचे मुख्यालयातील उपसंचालक वरील समितीचे **"सदस्यसचिव"** म्हणून कामे करतील. क्षेत्रीय स्तरावर सदर समिती प्रसिध्दीबाबतची योजना तयार करणे व त्याअनुषंगाने प्रसिध्दीशी निगडित कामांची अंमलबजावणी करण्यासंदर्भात महासंचालक, सामाजिक वनीकरण यांचे निर्देशाप्रमाणे संनियंत्रणासाठी मदत करतील. तसेच प्रसिध्दीबाबतची योजना तयार करून सदर समिती, क्षेत्रीय योजना (ज्यात जिल्ह्यांतून प्राप्त योजनांचा समावेश राहील) महासंचालक, सामाजिक वनीकरण यांचेकडे पाठवतील.

प्रत्येक जिल्हयामध्ये उपसंचालक,सामाजिक वनीकरण हे कार्यरत असून, जिल्हा माहिती अधिकारी यांच्या कामाच्या धर्तीवर वन, वन्यजीव आणि सामाजिक वनीकरण विभागाची माहिती व प्रसिध्दीची कामे करतील. प्रत्येक जिल्हयाकरिता माहिती व प्रसिध्दीची योजना तयार करण्याकरिता समिती गठीत करण्यात येईल.जिल्हयातील वरिष्ठ वन अधिकारी या समितीचे अध्यक्ष राहतील.

वन आणि सामाजिक वन विभागातंर्गत प्रसिध्दी आणि विस्तार या संदर्भातील कामकाज अधिक गतीमान आणि लोकांना चटकन नजरेत भरणारे असावे. त्याअनुषंगाने वन विभागाच्या माहिती व प्रसिध्दी शाखेतर्फे वर नमूद कामांव्यतिरिक्त प्रसिध्दी व विस्तार या संदर्भात खालील कामांचा देखील अंतर्भाव राहील.

१. जागतिक तापमानातील बदल,(Global Warming),हवामानातील बदल (Climatic Changes ), पर्यावरणीय बदल (Environmental Changes )आणि वायु,ध्वनी व जल प्रदुषण यामुळे मानवी जीवनास सामोरे जाव्या लागणाऱ्या संकटांची चाहूल समाजातील सर्व स्तरावरील लोकांना होत असल्याचे दिसून येते. या सर्व समस्यांची तीव्रता कमी करण्याच्या दृष्टीने वन, वन्यजीव,जैवविविधता, यांचे सरंक्षण, संवर्धन,विकास,व्यवस्थापन आणि वनक्षेत्र व वनाच्छादन वाढवणे इत्यादीबाबत लोकांमध्ये व्यापकरित्या विचारमंथनघडवून आणणे आवश्यक आहे.

२. वन, वन्यप्राणी, जैवविविधता, पर्यावरण आणि वृक्षाच्छादन या संदर्भात, प्रिन्ट आणि इलेक्ट्रॉनिक मिडिया, बस/रेल्वे इत्यादी सार्वजनिक वाहतूकीची साधने आणि सार्वजनिक जागा याठिकाणी आकर्षक आणि लोकांना तात्काळ भावतील अशा जाहिराती दयाव्यात. तसेच चित्रफिती (Video Films), लहान स्वरुपातील चित्रपट, लेख ,भित्तीपत्रे, छोटया पुस्तिका याव्दारे मोठया प्रमाणात जनजागृती घडवून आणण्याचा प्रयत्न व्हावा.

३. चित्रपट, व्याख्याने, कार्यशाळा,सभा , चर्चासत्रे आणि इतर कोणतेही सार्वजनिक कार्यक्रम सुरू होण्यापुर्वी वन व पर्यावरणाशी संबंधित बाबींवर किमान एक छोटी फिल्म आणि जाहिराती दाखविण्याबाबत व त्यातून लोकांचे शिक्षण आणि प्रबोधन करण्याचा प्रयत्न व्हावा. अशा प्रसंगी सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित केले असल्यास त्यादरम्यान देखील अशा जाहिराती/फिल्मस् दाखविणे शक्य आहे.

४. वृत्तपत्रे, शासकीय आणि खाजगी दूरचित्रवाहिन्या, मॉल्स्, थिएटर आणि सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेची साधने ( बस, रेल्वे, इ. ) आणि स्थळे इत्यादी ठिकाणी जाहिराती/लेख दयावयाचे झाल्यास नेहमीच्या व्यापारी तत्वावर या बाबी करणे अतिशय महाग पडेल. शासनाकडील दूर्मिळ असा निधी वापरण्यावर आणि उपलब्धतेवर मर्यादा आहेत. त्यामुळे सामाजिक जाण/बांधिलकी ठेवून या क्षेत्रातील लोकांनी/संस्थानी एकतर मोफत किंवा अतिशय कमी दराने (कमर्शियल दरापेक्षा कमीत कमी २५ टक्के वा योग्य त्या दरात ) वन व पर्यावरण विषयक जाहिराती आणि प्रसिध्दी देणे उचित राहील.

त्यासाठी त्यांना प्रोत्साहित आणि उद्युक्त करणे आवश्यक आहे. याबाबतीत देखील वेळोवळी वैयक्तिक संपर्क आणि चर्चेव्दारे या क्षेत्रातील लोकांचे आणि संस्थांचे मन वळविण्याचा सातत्याने प्रयत्न करणे गरजेचे आहे. त्यातून प्रसिध्दी आणि विस्तार कार्यक्रम जास्तीत जास्त लोकांसमोर पोहचविणे शक्य होईल.

५. वन, वन्यप्राणी, जैवविविधता, पर्यावरण आणि वृक्षाच्छादन वाढविण्याच्या दृष्टीने या क्षेत्रातील संशोधन, शिक्षण आणि प्रशिक्षण या माध्यमातून केलेले काम देखील जाहिरातीव्दारे लोकांसमोर येणे अपेक्षित आहे. तरच स्थानिक हवामान आणि मातीचा स्तर याच्याशी समरूप अशा वृक्षांच्या आणि प्राण्याच्या नविन प्रजाती लोकांना माहित होतील. त्यातून जैवविविधतेच्या विकासाला अधिक चालना मिळू शकेल.

६. शासनाच्या विविध वेबसाईट आणि सोशल मिडिया यावर वन आणि पर्यावरणांसंबंधित महत्वपुर्ण कामांची/योजनांची/निर्णयांची माहिती, जाहिराती/लेख, छोटया फिल्मस् इत्यादीं वेळोवेळी अपलोड करणे आवश्यक आहे. त्या माध्यमातून वन, वन्यप्राण्याचे व वनक्षेत्र वाढविण्याचे महत्व जनतेसमोर ठळकरित्या आणणे शक्य आहे. अशी माहिती वेळोवेळी अद्ययावत करणे आणि नविन संकल्पनाचा वापर करुन जनतेला या क्षेत्राचे असलेले उच्चत्तम महत्व नजरेदाखल करणे देखील गरजेचे आहे.

७. वन व सामाजिक वनीकरण क्षेत्रामध्ये होत असलेले उत्तम काम जनतेसमोर आणण्यासाठी किमान दर आठवडयाला एक अंक किंवा छोटी पुस्तिका प्रसिध्द करण्यात यावी. यासाठी मान्यवरांचे विशेषत: वन विभागाच्या सेवेत असणाऱ्या आणि सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांना लिखाणासाठी प्रोत्साहित करावे. त्यांच्या अनुभवाचा आणि ज्ञानाचा उपयोग वन आणि सामाजिक वनीकरण विभागाचे महत्व तळस्थरापर्यंत नेण्याच्या दृष्टीने करुन घ्यावा.

८. जळावू आणि इमारतीसाठीचे लाकूड आणि लाकडापासून तयार होणारा कागद इत्यादीस पर्याय म्हणून कोणते साहित्य उपलब्ध आहे किंवा होवू शकते याची देखील माहिती, जाहिराती आणि प्रसिध्दीव्दारे विस्तृतरित्या जनतेसमोर पोहचविणे आवश्यक आहे. त्यातून मोठया प्रमाणातील जंगलतोडीपासून वनांचे पर्यायायाने वन्यप्राण्याचे आणि जैवविविधतेचे सरंक्षण होवू शकेल.

९. देशात आणि राज्यात होणाऱ्या बहुतांशी बांधकामात लाकडाचा मोठया प्रमाणात वापर होतो. त्यासाठी जंगलांची अवैधरित्या तोड होते. ते टाळण्यासाठी निसर्ग आणि पर्यावरणाशी पूरक (Eco- friendly)साहित्य आणि साधन सामुग्री वापरण्याकडे लोकांचा कल वळविणे अत्यंत गरजेचे आहे. त्यासाठी जाहिरात आणि विस्तार यांच्या माध्यमांतून जन-जागृती घडवून आणण्यास मोठा वाव आहे. त्यादिशेने प्रसिध्दी व विस्तार या शाखेचे कामकाज होणे आवश्यक आहे.

१०. दर वर्षासाठी प्रसिध्दी आणि विस्तार या कार्यक्रमातंर्गत कोणती कामे हाती घ्यावयाची याचा सखोल आणि विस्तृत असा नियोजनबध्द आराखडा वर्ष सुरू होण्यापुर्वी किमान चार महिने आधी तयार करण्यात यावा. त्यासाठी आवश्यक ती तरतूद त्या वर्षाच्या अर्थसंकल्पात होण्यासाठी प्रयत्न करण्यात यावेत. प्रसिध्दी आणि विस्तार कार्यक्रमांत खाजगी व्यक्ती, अशासकिय संस्था, स्वंयसेवी संस्था, खाजगी उद्योजक, उद्योजकांच्या संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था आणि त्यांचे पदाधिकारी, लोकप्रतिनिधी यांचा सहभाग आणि आवश्यक निधी उपलब्ध करुन घेवून असे कार्यक्रम प्रभावीपणे राबविणे आवश्यक राहील.

११. प्रसिध्दी आणि विस्तारा संदर्भातील कामकाज व्यावसायिक पध्दतीने होण्यासाठी व्यावसायिक जाहिरात संस्थेची नेमणूक करण्यात यावी. सदर संस्थेने इलेक्ट्रॉनिक आणि प्रिंट मिडिया आणि समाज माध्यमे (Social Media) यांच्याबरोबर संपर्क साधून वन विभागाशी संबंधित कामकाज विस्तृतरित्या

जनतेसमोरनेण्याची त्यांची जबाबदारी राहील. त्याचबरोबर जिल्ह्यामध्ये वनविभागाशी संबंधित दररोज ज्या घटना घडतात त्यांचे विश्लेषण त्याच दिवशी करून त्यासंदर्भात जनतेचे मत सकारात्मक की नकारात्मक याबाबत अंदाज घ्यावा. जर मत नकारात्मक वाटले तर त्याबाबत कशारितीने सुधारणा करता येतील याबाबत विभागाने धोरण (Strategy) ठरवावी. सदर घटनांबाबची माहिती दैनंदिन स्वरूपात तयार करण्यात यावी आणि सदर माहिती मा. मंत्री (वने ), मा. सचिव ( वने ) यांच्यासह राज्यस्तरावरील सर्व संबंधित महत्वाच्या अधिकाऱ्यांना कळविण्यात यावी.

१२. जिल्हास्तरावर प्रसिद्ध होणाऱ्या टिकात्मक बातम्यांची कात्रणे संबंधित क्षेत्रीय अधिकाऱ्यांना पाठवून त्याबाबतचा वस्तुस्थितीदर्शक अहवाल/खुलासा २४ तासाच्या आत सादर करण्याबाबत कळवावे. त्यानंतर त्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याने सुचवल्यास, त्यानुसार संबधित वृत्तपत्र/ इलेट्रॉनिक मिडिया यांच्याकडे तात्काळ खुलासा करावा.

१३. वन विभागाशी संबंधित जाहिराती, रेडिओसाठीच्या जिंगल्स, दूरचित्रवाहिन्यांसाठी छोटया जाहिराती(TV Spots) आणि वृत्तचित्र ( Documentaries) तयार करण्यासाठी व्यावसायिक डिझायनरचे पॅनल तयार करण्यात यावे. त्यांच्यामार्फत उपरोक्त बाबी तयार करुन घेण्यात याव्यात.

१४. पारितोषिक वितरण समारंभ, वन, वन्यजीव आणि पर्यावरणाशी संबंधित राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय विशेषदिन इत्यादी उत्तमरितीने साजरे होण्यासाठी व्यावसायिक इव्हेंट मॅनेजरची निवडीद्वारे नियुक्ती करावी.

१५. वन विभागातंर्गत वन, वन्यजीव, जैव विविधता, संशोधन, वनक्षेत्र वाढविण्याच्याद्दष्टीने झालेले प्रयत्न,जागतिक तापमान वाढ, हवामानातील बदल, पर्यावरणीय बदल याची तीव्रता कमी करण्यासाठी करण्यात येत असलेल्या चांगल्या उपाययोजनाबाबत यश मिळाल्यास त्या यशोकथा (Success Stories) म्हणून गणल्या जाव्यात. अशा यशोकथांना व्यापकरित्या प्रसिद्धी देण्यासाठी त्या भागातील महत्वाची वृत्तपत्रे/ वृत्तवाहिन्याच्या प्रतिनिधींना दाखविण्यात याव्यात. त्यासाठी आवश्यक ती वाहतूक, भोजन व इतर खर्च विभागामार्फत करण्यात यावा.

१६. वनविभागातंर्गत आयोजित महत्वाच्या कार्यक्रमांची माहिती, स्थानिक स्तरावर जिल्हा माहिती अधिकारी यांना कळविण्यात यावी. जेणेकरून त्याची प्रसिद्धी राज्यपातळीवर होण्यास मदत होऊ शकेल. तसेच त्यातून चांगल्या बाबी जनतेसमोर जाण्यास मदत होईल.

१७. आपली संस्कृती आणि परंपरा लक्षात घेऊन विविध सण साजरे होतात. उदा: राखी पौर्णिमा, वट पौर्णिमा, होळी, रंगपंचमी इत्यादी. असे सण साजरे करतांना कोणती काळजी घ्यावयाची व जंगल आणि पर्यावरण यांचे रक्षण व संवर्धन अधिक चांगल्या रितीने कसे करता येईल याबाबतची माहिती देणारे कार्यक्रम आयोजित करून त्यास व्यापक प्रमाणात प्रसिद्धी देण्यात यावी.

प्रसिध्दी व माहिती यासाठी प्राप्त होणारे सर्व अनुदान प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,सामाजिक वनीकरण, यांच्याकडे वळती करण्यात येईल व त्यांच्यामार्फत संपुर्ण प्रसिध्दी व माहितीच्या कामे करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्धकरण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१६१४१८०४६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.16 14:22:01 +05'30'

**डी. एल. थोरात**
सहसचिव (वने)

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (अर्थ नियोजन व वने)यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री ( सर्व ).
५. मा.मंत्री राज्यमंत्री ( वने )यांचे खाजगी सचिव.
६. सचिव (वने), महसूल व वन विभाग.
७. सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वन्यजीव ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( उत्पादन व व्यवस्थापन ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( प्रशासन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक( केंद्रस्थ अधिकारी), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनसंवर्धन अधिनियम -१९८०), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( कॅम्पा ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( माहिती, तंत्रज्ञान व प्रसिध्दी), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२०. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( संसाधन उपयोग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( शिक्षण व प्रशिक्षण ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२२. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
२३. सर्व मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक)
२४. सर्व उपवनसंरक्षक व उपविभागीय अधिकारी.
२५. सर्व विभागीय आयुक्त.
२६. सर्व जिल्हाअधिकारी

२७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

२८. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)

२९. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.

३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

३१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०३२.

३२. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई.

३३. उप सचिव/अवर सचिव(सर्व), वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३४. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,फ-५ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३५. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३६. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

३७. निवडनस्ती/फ-११.